**महसूल व वन विभागाच्या अधिनस्थ असलेल्या सक्षम प्राधिकाऱ्यांकडून निर्गमित होणारे अनुसूचित जमातीच्या जात प्रमाणपत्राची तसेच अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्र तपासणी समितीकडून निर्गमित होणारे वैधता प्रमाणपत्र या कामकाजांमध्ये समन्वय होण्यारिता उपाययोजना सूचविण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या "समन्वय समितीस" मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसटीसी-२०१४/प्र.क्र.१२६/का.१०**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २२ सप्टेंबर, २०१५.

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः एसटीसी-२०१४/प्र.क्र.१२६/का.१०, दिनांक १२.९.२०१४.**
२) **सरकारी वकील यांचे पत्र क्र.९१५८/२०१४, दिनांक २१.८.२०१४.**

प्रस्तावना -

आदिवासी समाज कृती समिती यांनी मा.मुंबई उच्च न्यायालय येथे दाखल केलेल्या जनहित याचिका क्र.७१/२०१४ या प्रकरणी मा.न्यायालयाने दिनांक १३.८.२०१४ रोजी दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने महसूल व वन विभागाच्या अधिनस्थ असलेल्या सक्षम प्राधिकाऱ्यांकडून निर्गमित होणारे अनुसूचित जमातीच्या जात प्रमाणपत्र तसेच अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समितीकडून निर्गमित होणारे वैधता प्रमाणपत्र या कामकाजांमध्ये समन्वय साधण्यासाठी दिनांक १२.९.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये समन्वय समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समितीची मुदत दिनांक ११.९.२०१५ रोजी संपुष्टात येत असल्यामुळे सदर समितीस आणखी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उपरोक्त प्रस्तावनेच्या अनुषंगाने, महसूल व वन विभागाच्या अधिनस्थ असलेल्या सक्षम प्राधिकाऱ्यांकडून निर्गमित होणारे अनुसूचित जमातीच्या जात प्रमाणपत्र तसेच अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समितीकडून निर्गमित होणारे वैधता प्रमाणपत्र या कामकाजांमध्ये समन्वय साधण्यासाठी दिनांक १२.९.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये समन्वय समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समन्वय समितीची मुदत दिनांक ११.९.२०१५ रोजी संपुष्टात येत असल्याने सदर समितीस दिनांक १२.९.२०१५ पासून आणखी एक वर्षाच्या कालावधीकरिता दिनांक ११.९.२०१६ पर्यंत या शासन निर्णयाद्वारे मुदतवाढ देण्यात येत आहे.

प्रस्तुत "समन्वय समिती"ने अभ्यास करुन उपाययोजना सूचविण्याच्या बाबी दिनांक १२.९.२०१४ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणेच राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२२१६३२३४५९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2015.09.22 16:36:48 +05'30'

(ल. गो. ढोके)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) मा.प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मा. प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) सर्व जिल्हाधिकारी
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) मा.आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
११) मा.महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
१२) मा. संचालक, एन.आय.सी. (नॅशनल इन्फॉर्मेटिक्स सेंटर), महाराष्ट्र, मुंबई
१३) कक्ष अधिकारी (संगणक कक्ष), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
१४) कक्ष अधिकारी (का.१०), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
१५) सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, ठाणे/पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/गडचिरोली/नंदुरबार/अमरावती
१६) सह सचिव/ सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवड नस्ती (का.१०)